महाराष्ट्र राज्यातील सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका यांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण केलेली अस्थायी पदे दिनांक ०१/०९/२०२१ ते २८/०२/२०२२ पर्यंत चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जिमस ०२२१/प्र.क्र.२४/१८-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : २२ सप्टेंबर, २०२१

**वाचा :-** १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. राजस १००८/प्र.क्र.५३८/५-स,दि. ५/५/२०११
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालय यांचे पत्र. जा.क्र. आस्थापना/कक्ष-१/जिमस बँक/मुदतवाढ/२०२१, दि. १०/०८/२०२१.
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. जिमस ०२२१/प्र.क्र.२४/१८-स, दि. २५/०२/२०२१.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक १०/०८/२०२१

**प्रस्तावना :-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ अन्वये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील स्थायी / अस्थायी पदांच्या आढाव्यानुसार सहकार विभागाचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आला असून सदर आकृतीबंधामध्ये प्रस्तुत ४५९ पदांचा समावेश आहे. उपरोक्त संदर्भ क्र. ३ अन्वये सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४५९ पदांना दि. ३१/०८/२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासनाने मंजूरी दिलेली होती. सदरची मुदतवाढ संपुष्टात येत असल्याने वर नमूद क्र. २ मधील पत्रान्वये ४५९ अस्थायी पदांपैकी २८ कार्यरत व ४३१ रिक्त अस्थायी पदांना सन २०२१-२२ या कालावधीसाठी पुढे चालू ठेवण्याबाबत प्रस्तावित केलेल्या कामकाजाच्या अनुषंगाने लेखापरीक्षण विभागास आवश्यकतेनुसार काम करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयामार्फत प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे, यांच्या उपरोक्त वाचा क्र. २ मधील प्रस्तावानुसार सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांच्या सतत व समवर्ती लेखापरिक्षणासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४५९ अस्थायी पदांना **दि.०१/०९/२०२१ पासून दि. २८/०२/२०२२ पर्यंत या शासन निर्णयाव्दारे मुदतवाढीस मंजूरी देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-१ | एस-२० : ५६१००-१७७५०० | २१ |
| २ | विशेष लेखापरिक्षक वर्ग-२ | एस-१५ : ४१८००-१३२३०० | ०६ |
| ३ | लेखापरिक्षक, श्रेणी-१ | एस-१४ : ३८६००-१२२८०० | १४ |
| ४ | लेखापरिक्षक, श्रेणी-२ | एस-१३ : ३५४००-११२४०० | १५५ |
| ५ | उपलेखापरिक्षक | एस-०८ : २५५००-८११०० | ६७ |
| ६ | कनिष्ठ लिपिक | एस-०६ : १९९००-६३२०० | १९६ |
| **एकूण पदे** | | | **४५९** |

उपरोक्त एकूण ४५९ अस्थायी पदांचा होणारा खर्च हा सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मागणी क्र.व्ही-२ मधील अर्थसंकल्पीय लेखाशीर्ष "२४२५- सहकार (००) १०१- सहकारी संस्थांचे लेखा परीक्षण- (एक)(ए) लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग (२४२५ ०२२७)" या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी केलेल्या

तरतूदीतून भागविण्यात यावा. परंतू ही अस्थायी पदे विहीत पध्दतीने भरली आहेत या अटीच्या अधीन राहून ही मंजूरी देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि. १०/०८/२०२१ अन्वये संबंधित प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या मुदतवाढीच्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२२१६१६४९७७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2021.09.22 16:18:25 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**वि. का. अ. तथा स. नि. स. सं., महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
२. महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.
३. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
४. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
५. कार्यासन अधिकारी, १७-स / ५-स / १२-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय. मुंबई.
६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. सहनिबंधक, सहकारी संस्था, (लेखापरिक्षण) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
८. सह निबंधक, सहकारी संस्था (लेखा), महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई
९. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१०. विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (लेखापरिक्षण) (सर्व)
११. विभागीय विशेष लेखारिक्षक, सहकारी संस्था, मुंबई विभाग, मुंबई.
१२. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१४. जिल्हा विशेष लेखापरिक्षक, सहकारी संस्था (सर्व)
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१७. व्यवस्थापक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक म. (सर्व)
१८. सह व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई.
१९. निवड नस्ती.